0135

दक्षिणा प्रैज कमितीनें बक्षिसें दिलेल्या
ग्रंथांची माला

नंबर ३.

# व्यवहारदर्पण.

( धातूविषयी )

हा ग्रंथ

## शंकरशास्त्री गोखले

यांनीं केला.

( पुणें, इसवी १८५७.—शके १७७९. )

तो

मे. डैरेक्टर आफ् पब्लिक इनस्त्रकूशन व मे. दक्षिणा
प्रैज कमितीचे अध्यक्ष यांच्या आज्ञेवरून

विष्णु परशुराम शास्त्री पंडित

यांनीं तपासला व

मुंबईंत
इंदुप्रकाशाच्या मालकांनीं आपल्या छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केला.

इसवी सन १८७१.—शके १७९३.

(हा ग्रंथ १८६७च्या २५ व्या आक्ताप्रमाणें नोंदला आहे.)
किंमत १२ आणे.

# प्रस्तावना.

परमेश्वरानें मनुष्यमात्रास जीवनोपाय आणि संसारांतील सुखांचें साधन जे पदार्थ त्यांपैकीं पुष्कळ अथवा बहुतेक सर्व पृथिवीपासून उत्पन्न व्हावे असें केलें आहे; परंतु ते लोकांस हवे तसतसे आपोआप उत्पन्न होत नाहींत. मनुष्यांनीं हवे तसे उत्पन्न करून घ्यावे लागतात. पृथिवींत जे पदार्थ उत्पन्न होतात त्यांचे आंगीं असा गुण नाहीं कीं, अमुक पदार्थ अमक्यासच मिळावा किंवा अमक्यासच उपयोगी पडण्याजोगा व्हावा आणि इतरास तो मिळूं नये किंवा उपयुक्त करून घेतां येऊं नये. यावरून सर्वांस सर्व पदार्थ मिळावे व ते त्यांच्या कामीं पडावे अशीच परमेश्वराची इच्छा आहे असें दिसतें. असें असतां जे लोक, कांहीं एक पदार्थ कसे मिळवावे किंवा ते व्यवहारांत कसे कामीं लावावे हें, ईश्वरानें दिलेलें ज्ञान फारच गुप्त ठेवितात आणि तेवढ्यावरच, आह्मी चतुर, गुणी, कारागीर असें मानितात त्यांस काय ह्मणावें! बरें, असे लोक किती आहेत? तर असंख्य. ते तरी अधिक ज्ञानसंपादनाविषयीं झटतात? नाहीं. असेल तेवढ्यावरच कृतकृत्यता मानून तृप्त असतात. आपणास कळलेली गोष्ट दुसऱ्यास सांगूं नये; कारण, सर्वांसच ती समजल्यावर आपलें महत्व काय? जर दुसऱ्यास

अडचणींत पडूं दिलें नाहीं तर त्यास आमची गरज काय? मग आमचें महत्व लोकांच्या मनांत कसें येईल? अशी जी त्या पुरुषांची गैर समजूत ती त्यांस व इतरांस संकटांत घालण्यास व लोकांतील विद्यांचा ऱ्हास होण्यास कारण होय. आपल्या भोंतालचे लोक जसजसे शहाणे होतील तसतसे ते अधिक सुख अनुभवतील. आणि भोंतालचे लोक सुखी असतील तसें आपणास सुख मिळेल, ही वास्तविक गोष्ट ते मनांत आणीत नाहींत. दुसरें, वर सांगितलेली गैर समजूत जो प्राणिमात्रांस निर्विवंचनेनें अन्नाछादनादि पुरवितो त्या ईश्वराच्या इच्छेस फारच विरुद्ध आहे. सर्वांस सुख व्हावें अशी त्याची इच्छा आहे; ह्मणून एकमेकाच्या हिताविषयीं परस्पर सर्वांनीं झटावें हें न्याय्य आणि अवश्य आहे असें मनांत आणून मनुष्यास संसारांत फार उपयोगी पडण्याजोगे पदार्थ कोणते ते विचारानें ठरवावे आणि त्यांच्या प्राप्तीचे उपाय लोकांत प्रसिद्ध करावे ह्मणजे त्यापासून बहुतांस उपयोग होईल असें वाटलें. तेव्हां मनांत आलें कीं, ईश्वरानें सृष्टींत मनुष्याच्या हिताकरितां अनेक पदार्थ उत्पन्न केले आहेत त्या सर्वांत धातु अत्यंत सुखसाधन आहेत. पाहा, अन्नपाणी तर सर्वांचे मुख्य जीवनोपाय आहेत तेही धातूंच्या सहायानें फार सुलभ होतात. स्थलविशेषीं तर धातूंशिवाय उपायच नाहींसें दिसतें. असेंच अन्नाखेरीज जे जे अवश्य पदार्थ—ह्मणजे राहायास घर, पांघरायास वस्त्र, वगैरे तेही धातूंच्या सहायानेंच सुरेख व लौकर करून घेतां येतात. धातूंच्या योगानें

व्यवहार ह्मणजे घेणें देणें सुलभ होतें. शस्त्रांच्या सहायानें कितीएक भयांचें निवारण होतें तीं शस्त्रें धातूंचीं होतात. शरीराचा खराबा करणारे कितीएक रोग धातूंच्या औषधानें जातात. शरीरास शोभविण्याकरितां धातूंचे अलंकार करितात. अशा अनेक प्रकारें उपयोगी पडणाऱ्या ज्या धातु त्यांची उत्पत्ति आणि त्या व्यवहारांत उपयोगी पडण्याजोग्या करणें, यांची माहिती मनुष्यास फारच उपयोगी आहे ह्मणून मी यथामति धातूंचें वर्णन करितों.

विचारशील, विद्वान् आणि उदार मनाचे जे पुरुष त्यांस माझी अत्यंत नम्रतेनें विनवणी आहे कीं, मी जातीनें मोठा बुद्धिमान् नाहीं व अत्यंत अभ्यासीही नाहीं, आणि ज्या गोष्टी मी पुढें लिहिण्याविषयीं इच्छितों त्यांचा माझे येथें पिढीजाद धंदा आहे असेंही नाहीं तथापि या ग्रंथापासून सर्व साधारण लोकांस कांहीं कांहीं अंशीं तरी व्यवहारांत उपयोग होईल असें दिसल्यावरून लेखनप्रवृत्तीस उत्तेजन येतें ह्मणून या ग्रंथांत ज्या ज्या न्यूनता असतील त्या त्यांनीं मजवर दयाळू होऊन पूर्ण कराव्या.

# सूचना.

या ग्रंथांत सोनें, रुपें, तांबें, पितळ, कथील, जस्त, शिसें, कासें, लोखंड आणि पारा या धातूंची प्राप्ति, शुद्धीकरण आणि व्यवहारांत उपयोग वगैरे हीं वर्णिलीं आहेत.

ज्या गोष्टी अवश्य असून या देशीं माहीत नाहींत त्या आमचे बंधु चिंतामण शास्त्री यांच्या साह्यानें इंग्रजी ग्रंथांतून घेतल्या आहेत.

लोकांत जो व्यवहार आजपर्यंत चालत आला आहे तो व जो किती एक कारागीर फार गुप्त ठेवितात त्याचा मोठ्या प्रयासानें शोध करून तो मीं या ग्रंथीं यथामति वर्णिला आहे.

# अनुक्रमणिका.

# व्यवहारदर्पण.

## धातु.

सर्व धातु पृथ्वींत सांपडतात. धातूंच्या आंगीं चमकणें, अतिजडत्व, आघातसहनशक्ति, विस्तारशक्ति हे गुण आहेत ह्मणून व्यवहारांत लोकांस त्यांपासून असंख्य उपयोग आहेत.

## सोनें.

सोनें, विस्तवांत[१] घालून कितीही वेळा आटविलें तथापि लक्षांत येण्याजोगें कमी होत नाहीं. प्लाटिनम ह्मणून युरोपखंडांत एक धातु आहे ती अतिजड आहे; परंतु या देशांत ज्या ज्या धातु आहेत त्या सर्वांत सोनें फार जड आहे. सोन्याच्या आंगीं पाण्यापेक्षां साडेएकुणीसपट जडत्व आहे. सोनें इतर धातूंपेक्षां फार जड आहे ह्मणून त्यांत इतर धातूंची मिसळ आहे किंवा नाहीं आणि असल्यास ती किती आहे हें सुलभ उपायानें कळतें.

सोन्याचा रंग पिंवळा आहे. विस्तारशक्ति हा गुण इतर धातूंपेक्षां सोन्यामध्यें विशेष आहे. ती किती आहे हें कलाबतूकरितां जो चपडा करितात

---

१. या देशांत सोनार आंच देतात त्या मानानें.

त्यावरून स्पष्ट दिसतें व तार ओढली जाणें हा गुणही इतर धातूंपेक्षां या धातूंत अधिक आहे. सोन्यावर ठसा चांगला उठतो व उजळा सोन्यासच बसतो व जिल्हई चांगली शोभते. हे गुण सोन्याच्या आंगीं आहेत ह्मणून हें अलंकार करण्याच्या फार उपयोगी आहे.

सोन्याच्या आंगीं साधारण[१] आंबट पदार्थांच्या योगानें कलंक येत नाहीं. हें अग्नींत जळत नाहीं व खुल्या हवेंत किंवा पुष्कळ वर्षें आच्छादित ठेवलें असतांही नासत नाहीं किंवा ह्याला जंग चढत नाहीं वगैरे कारणांमुळें ह्याचें नाणेंही पाडतात.

या हिंदुस्थान देशांतील बहुतेक लोकांस सोन्याची उत्पत्ति कोठें होते व तें कसें काढतात याविषयीं वास्तविक माहिती नाहीं.

कितीएक उद्मी आणि व्यवहारांत वागणाऱ्या वृद्ध वृद्ध पुरुषांस सोनें कसें उत्पन्न होतें व कोठें होतें असें विचारिलें असतां ते चमत्कारिक उत्तरें सांगतात. बहुत काळापासून येथील लोकांच्या मनांत सोन्याच्या उत्पत्तीविषयीं कांहीं चमत्कारिक कल्पना खरेपणासारख्या ठसल्या आहेत. त्या पांच प्रकारच्या आहेत व त्यांच्या कथाही ते सांगतात. ते प्रकार व कथाही लिहितोंः—

१. कोणा एका देशांत विहीर आहे तिच्या जळांत कांहींएक वेळ साधून तांबें बुचकळलें ह्मणजे सुवर्ण होतें.

---

१. नैत्रोम्यूरातिक हा आंबट पदार्थ मात्र त्यास विरवितो.

कारागीर, तांबट वगैरे लोक, तांब्याच्या पुतळ्या घडून त्यांस भोंकें पाडून जिल्हई देऊन तयार करून त्यांच्या माळा करून ठेवितात. द्वीपांतरीं एक विहीर आहे ( हें द्वीप कोठें आहे व त्याचें नांव काय हें कोणास माहीत नाहीं ) तींत, साडेतीन वर्षांनीं एक घटका मुहूर्त येतो ( तो मुहूर्त कोणत्या दिवशीं, कोणत्यावेळीं हेंही कोणास माहीत नाहीं ) त्या मुहूर्तीं वर सांगितलेल्या पुतळ्यांच्या माळा त्या विहिरींत बुडवितात ह्मणजे त्या सर्व पुतळ्या सोन्याच्या होतात. कदाचित त्या मुहूर्तीं अर्धी किंवा कांहीं कमजास्त माळ विहिरींत बुडाली आणि कांहीं पाण्याबाहेर राहिली तर माळेचा बाहेरचा भाग तितका तसाच राहतो. त्या भागांतील पुतळ्या सोन्याच्या होत नाहींत. जर त्या मुहूर्तीं निमे पुतळी पाण्यांत बुडून निमे बाहेर राहिली तर ती बाहेरची अर्धीच तांब्याची राहते. कांहीं भाग तांब्याचा व बाकी सर्व भाग सोन्याचा अशा पुतळ्या अद्यापि आढळतात असें सांगतात. अशा प्रकारें तांब्याच्या पुतळ्या सोन्याच्या झाल्या ह्मणजे त्या विहिरींतून काढून त्यांचा व्यवहारांत विनियोग करतात.

२. कोण्या वेळेस सत्पुरुषाच्या योगानें सुवर्णाचा पाऊस पडला.

कर्नाटकांत आनेगोंदी शहरांत भुक्कणराजा राज्य करीत असतां माधव या नांवाचा कोणी एक महापंडित भुक्कणराजाचा कारभारी होता त्याचा कांहीं काळ दिवाणगिरींत गेल्यावर त्याच्या अंतःकरणांत लौकिक व प्रपंच यांविषयीं विरक्ति झाली तेव्हां त्यानें सर्व लौकिक

व्यवहार सोडून देवतेचें आराधन केलें. देवतासा-क्षात्कार व्हावा या इच्छेनें बहुत काळ पर्यंत तपश्चर्या केली, परंतु मनोरथ सिद्ध झाला नाहीं ह्मणून अंतःक-रणास उद्वेग उत्पन्न होऊन त्या पंडितानें संन्यास घेत-ला. त्यानें संन्यास ग्रहण करतांच देवता प्रसन्न झाली. देवतेनें माधवाला दर्शन देऊन 'तुजवर प्रसन्न झाल्यें, मनोरथ असेल तो वर माग' असें सांगितलें. तेव्हां माधवानें सांगितलें कीं, 'मी सर्वसंग परित्याग करून संन्यासग्रहण केलें. आतां मला कोणत्याही पदा-र्थाची इच्छा नाहीं. आपण प्रसन्न झालां तर मज-वर कृपा असावी.' तेव्हां देवतेनें पुनः सांगितलें कीं, 'माझें येणें व्यर्थ होणार नाहीं, तुला सरस्वति प्रसन्न आहे; तूं वेदभाष्य कर; आणि तुला लक्ष्मी प्रसन्न आहे; तुझ्या आसपास बारा कोस सुवर्णवृष्टि होईल. या दोन गोष्टींनीं इहलोकीं अद्भुत कीर्ति व परलोकीं अपार सुख प्राप्त होईल.' असा आशीर्वाद देऊन देवता अंतर्धान पावली. उत्तरक्षणीं तेथें सोन्याच्या होनांचा पाऊस पडला तो पाऊस बारा कोस क्षेत्रांत एक प्रहर सारखा पडत होता. जे होन ज्या घरांत पडले ते त्या घराच्या मालकानें घेतले व याखेरीज रस्त्यांतील वगैरे होन भुक्कण राजानें घेतले.

२. पाषाणविशेषाच्या आंगीं कांहीं एक गुण आहे त्या योगानें त्याचा स्पर्श लोखंडास झाला असतां तें लोखंड सुवर्ण होतें. त्या पाषाणास परिस ह्मणतात.

पूर्वीं या देशांत कोणी एक हेमाडपंत नामें महा विद्वान राजवैद्य असे. त्या वेळेस लंकेत बिभीषणास

कांहीं व्याधि उत्पन्न झाला, त्याचा उपशम व्हावा ह्मणून तेथील वैद्यांनीं बहुत प्रकार योजिले तथापि ते व्यर्थ झाल्यावरून देशोदेशीं, वैद्यक्रियेंत निपुण कोण आहेत असा शोध केला; तेव्हां हिंदुस्थानांत हेमाडपंत चांगला वैद्य आहे असें ऐकण्यांत आल्यावरून मोठ्या युक्तीनें त्यास लंकेंत नेलें. त्यानें तेथें चातुर्यबलानें बिभीषणराजाच्या प्रकृतीस आरोग्य केलें; तेव्हां राजानें प्रसन्न होऊन हेमाडपंतास परिस व या देशास अपूर्व असे कांहींएक पदार्थ दिले आणि त्याची रवानगी केली. नंतर या देशीं हेमाडपंतानें मोठमोठालीं देवळें व घाट त्या परिसाच्या सामर्थ्यानें बांधिलीं.

४. कोणा एका देशांत जांबळीचें झाड आहे, त्याच्या फळापासून सोनें होतें.

मेरुपर्वताजवळ एक पर्वत आहे त्यावर जांबळीचें झाड आहे. त्याचीं जांबळें पिकून खालीं पडतात. झाडाखालून जांबू नदी वाहते त्या नदीचे तीरीं वाळूंत तीं जांबळें पडतात त्यांचें सोनें होतें. तें वाळूंत मिसळून प्रवाहानें वाहत जातें. ती वाळू आणून लोक तींतून सोनें काढतात त्यास जांबूनद सुवर्ण ह्मणतात.

५. कांहीं एक वनस्पति, ताम्र, पारदादि धातु, आणि कांहीं क्षार यांच्या योगानें सोनें करितात त्यास किमया ह्मणतात.

पूर्वी अकब्बर ह्मणून कोणी एक पादशाह राज्य करीत असतां त्याजकडे कोणी एक अवलिया फकीर आला. नंतर पादशाहा आणि फकीरबावा यांची

गांठ पडून परस्परांचें संभाषण झाल्यावर पादशाहास त्या फकीरबावाच्या आंगीं कांहीं अद्भुत गुण आहेत व कांहीं सिद्धाई आहे असें भासल्यावरून पादशाहानें किमयाविषयीं गोष्ट काढिली. आणि त्यास विचारिलें कीं, 'किमया हा पदार्थ खरा आहे किंवा खोटा?' तेव्हां फकीरबावानें उत्तर केलें कीं, 'किमया पदार्थ खरा आहे व तो मला येतो आहे आणि कोणी खुषामतीनें घेईल तर त्यास मिळेल.' हें त्याचें शेवटचें बोलणें ऐकून पादशाहाच्या अंतःकरणास विषाद उत्पन्न झाला; आणि तो त्यावर डोळे वटारून ह्मणाला कीं, 'हा फार मगरूर आहे याला पाहऱ्यांत बसवा, कचेरींत बे अदबीचें भाषण करितो.' अशा प्रकारें धमकी देऊन कचेरींतून एकीकडे नेवविला, आणि शहरांतच त्याला एक चांगली जागा राहावयास देऊन सरकारसंबंध न कळूं देतां त्याचा खाण्यापिण्याचा वगैरे चांगला बंदोबस्त ठेवून, त्यानें पळून कोठें जाऊं नये ह्मणून त्याच्या रक्षणार्थ पाहरा ठेविला. नंतर आठ चार दिवशीं कचेरींत आणवून त्यास पादशाह माराची वगैरे धमकी देऊन विचारी कीं, 'किमया कसा करितात हें सांग.' परंतु तो सांगेना. असे कांहीं दिवस गेल्यावर, पादशाह भिस्त्याचें सोंग घेऊन गुप्त रीतीनें अवलियांच्या घरीं प्रत्यहीं जाऊन त्यास हुक्का भरून देणें, आंग रगडणें वगैरे अनेक प्रकारें रात्रीं दोनदोन प्रहर त्याची चाकरी करी. आणि त्यासमयीं असा भाव दाखवी कीं, आपण महा थोर पुरुष ईश्वराप्रमाणें सेव्य, मी यःकश्चित अडाणी व

महादरिद्री आहे. अशा सेवेंतही कांहीं बराच काळ गेल्यावर एके दिवशीं पादशाहानें कचेरींत त्या अवालियास आणून पुसलें कीं, अजून तरी तुमची जडीबुटी काय ती सांगा. नाहीं तर प्राणास मुकाल. परंतु मरणाचेंही भय कांहीं मनांत न आणितां त्यानें बेधडक उत्तर केलें कीं, 'विद्या गुलामगिरीनें मिळते, जबरीनें मिळत नाहीं, व तुझ्या धाक दाखविण्यानें किंवा माराहाणीनें मी तुला वश होणार नाहीं.' असें त्याचें भाषण ऐकून पादशाहानें सेवकांस हुकूम केला कीं, 'याचें उदयीक डोकें मारा, हा पुन: माझ्या दृष्टीस पाडूं नका, जा याला घेऊन; याला लवकर माझ्या दृष्टीनिराळा करा.' असें सांगून पुन: त्यास बंदिखान्यांत ठेवण्याचा हुकूम केला. नंतर पादशाह नित्याप्रमाणें प्रहर दहा घटिका रात्रीं भिस्त्याचा वेष धरून फकीरबावाजवळ जाऊन रडूं लागला. तेव्हां त्याला पाहून व करुणास्वर ऐकून फकिरास फार दया आली. फकिरानें विचारिलें कीं, तुला काय संकट आहे ?' तेव्हां पादशाह अगदीं गहिंवरून गेला. त्याचा कंठ दाटला, तोंडांतून शब्द निघेना आणि डोळ्यांतून अश्रुधारा अधिक चालूं लागल्या. हें पाहून आणि पूर्वींची त्याची चाकरी स्मरून फकिरास फार कळवळा आला; तेव्हां फकिरानें सांगितलें कीं, तूं या वेळेस जें मागशील तें तुला देतों, माग. तुला कोणतें संकट पडलें असेल तें किंवा कोणतें दुःख झालें असेल तें मला सांग, ह्मणजे त्याचें निवारण होईल. नंतर तो वेषधारी भिस्ती

ह्मणाला, 'महाराज, माझें दुःख काय पुसतां ! आजच्या माझ्या दुःखाला पारावार नाहीं; परंतु आपण कृपाळू होऊन सर्व दुःख परिहार होईल ह्मणून अभिवचन दिलें, आपण मला ईश्वराप्रमाणेंच आहां, मी फार गरीब आणि आपण फार थोर. कृपाकरून मला किमया सांगितला असतां मी सर्व दुःखांतून पार होईन अशा हेतूनें आपली सेवा बरेच दिवस केली; परंतु आज पादशाहाच्या कचेरींतील कांहीं विपरीत वर्तमान ऐकिलें. त्यावरून उद्यां रात्रीं आपले पाय माझ्या दृष्टीस पडतील अशी आशा राहिली नाहीं.' अशा प्रकारें मृदुशब्दांनीं त्याच्या अंतःकरणास कळवळा विशेष उत्पन्न होई असें बोलणें बोलून आपणापासून मला किमया प्राप्त व्हावा अशी इच्छा आहे व ती पूर्ण झाली असतां महत्संकटांतून मी सुटेन व किमया सांगण्यास हाच समय आहे पुढें वेळ नाहीं, असें त्या भिस्त्यानें प्रदर्शित केल्यावरून फकिरानें त्यास किमया सांगितला. तो संपूर्ण शिकून फकिराच्या पायीं डोकी ठेवून पादशाह आपले वाड्यांत आला. दुसऱ्या दिवशीं नित्याप्रमाणें फकिरास कचेरींत बोलावून आणून पादशाहानें विचारिलें 'अजून तरी किमया सांगावासा वाटतें कीं नाहीं ? का हट्टानें मरून जाणार !' फकिरानें उत्तर दिलें 'तूं उगाच पुष्कळ बडबडतोस. माझ्याकडील उत्तर मी तुला पूर्वींच सांगितलें आहे.' तेव्हां, पादशाहा त्याजकडे पाहून हंसला आणि ह्मणाला 'आतां आपण पाहिजे तिकडे जावें आपणास कांहीं प्रति·

बंध नाहीं. आपणापासून किमया मी शिकलों. आपणास मात्र विदित नाहीं.' तेव्हां फकिरानें मनांत तर्क केला कीं, माझी चाकरी करणारा भिस्ती तो हाच. फकिरानें सांगितलें कीं, 'तुला मजपासून किमया मिळाला ह्मणून तूं ह्मणतोस ही गोष्ट खरी. परंतु खिसमतगारीनें मिळाला, जबरीनें मिळाला नाहीं. मी तुला वचन दिलें व तुला किमया सांगितला हें खरें; परंतु तूं कपटानें मजपासून विद्या काढलीस ह्मणून ती तुला एकदांच फलद्रूप होईल.' नंतर पादशाहानें त्याचा सन्मान करून त्यास मार्गस्थ केलें. पुढें त्यानें सांगितल्याप्रमाणें पादशाहानें एकदां किमया केला. त्यावेळेस फार मोठी भट्टी लावली होती तें सोनें उत्कृष्ट झालें. याप्रमाणें बहुत लोक सांगतात. पृथ्वींतच कांहीं कांहीं ठिकाणीं सोनें सांपडतें, आणि तें क्रियाविशेषानें काढतात असें फारच थोड्या लोकांच्या सांगण्यांत येतें.

याप्रमाणें दंतकथा आहेत. परंतु खरा प्रकार ह्मटला ह्मणजे सोनें पृथ्वीच्या पोटांत असतें व तें स्वयंभू असून दुसऱ्या पदार्थांच्या मिश्रणानें होत नाहीं.

दक्षिण अमेरिका, उत्तर अमेरिका, युरोप, आणि एशिया या सर्व खंडांत कांहीं कांहीं ठिकाणीं सोनें सांपडतें. हिंदुस्थानांत गुलाबशिंगाच्या पहाडाकडे व कर्नाटकाकडे असें कांहीं कांहीं ठिकाणीं सोनें सांपडतें.

सोनें खाणींत किंवा दगडाच्या शिरांत सांपडतें. क्वचित दरींत, खोऱ्यांत, ओहोळांत किंवा नदीच्या वा-

ळवंटांत सोन्याचे कण मातींत किंवा वाळूंत मिसळलेले आढळतात.

## सोनें काढण्याचे प्रकार.

### पहिला प्रकार.

मातींत किंवा वाळूंत मिसळलेलें सोनें तींतून निराळें काढणें झालें असतां, रुंद तोंडाचें उथळ मेणिबलेलें टोपलें किंवा अशा प्रकारचें परळ, पाळें वगैरे पात्र घेऊन त्यांत सुवर्णमिश्रित माती अथवा रेती घालून त्यांत थोडें थोडें पाणी घालून जें पात्र असेल त्यांतली माती किंवा वाळू झारेकऱ्याप्रमाणें घोळून तें पाणी टाकावें. नंतर दुसरें पाणी त्यांत घालून पूर्वीप्रमाणेंच घोळून टाकावें; याप्रमाणें आठ दहा वेळ केलें ह्मणजे माती व बारीक वाळू पाण्याबरोबर वाहून जाते. आणि वाळूचे मोठमोठे खडे व सोन्याचे कण त्या पात्रांत राहतात. नंतर ते खडे घोळून काढावे ह्मणजे केवळ सोन्याचेच कण त्या पात्रांत राहतात; ते काढून घ्यावे आणि मुशींत घालून आटवावे ह्मणजे उत्तम सोनें तयार होतें.

### दुसरा प्रकार.

उतरत्या टेबलावर जाडें लोंकरीचें वस्त्र अथवा जनावराचें जाड लोंकरीसहित (ह्मणजे ज्याची लोंकर काढली नाहीं असें) कातडें घालून त्यावर सुवर्णमिश्रित माती किंवा रेती असेल ती हातानें थोडी थोडी घालून तिजवर थोडें थोडें पाणी ओतावें

ह्मणजे मातीचा अंश किंवा वाळू त्या पाण्याबरोबर धुऊन जाते आणि सोन्याचे कण जड असतात ते त्या लोंकरींत गुंतून राहतात. नंतर त्या कणांबरोबर वाळूंतले जाडे जाडे कांहीं खडे त्या लोंकरींत गुंतून राहतात ते टोपलींत किंवा सुपांत घालून घोळून काढून टाकावे आणि सोन्याचे कण एकत्र होण्यासाठीं आटावे.

दगडाच्या शिरांतून सोनें सांपडतें तें बहुतकरून स्वच्छच असतें. क्वचित् स्थलीं त्याचे कण किंवा पातळ पत्रेवजा तुकडे इतर पदार्थांशीं मिसळलेले असतात. ते सांपडल्यास ते इतर पदार्थांपासून निराळे करण्याचा प्रकार असा आहे कीं, ते तुकडे एकत्र जमवून मुसळानें कुटून त्यांचें चूर्ण करावें आणि त्यांवर मिठाच्या पाण्याचा हपका द्यावा. नंतर छिद्रमय कातड्याच्या पिशवींत पारा घालून ती पिशवी त्याचूर्णावर दाबावी ह्मणजे त्या पिशवीच्या छिद्रांतून पाऱ्याचे कण बाहेर येतात आणि त्याचूर्णांत मिसळतात. नंतर त्या चूर्णाचा गोळा करून तो गोळा भांड्यांत घालून चार दिवस मंदाग्नीवर ठेवावा ह्मणजे सोन्याचा आणि पाऱ्याचा अंश एकत्र होऊन इतर पदार्थांचे अंश वेगळे राहतात. नंतर त्यावर पाणी घालून धुऊन मळकट पाणी निघतें तें सर्व टाकावें ह्मणजे पाऱ्यानें मिश्रित सोन्याचे कण मात्र बाकी राहतात. मग ते कण कातड्याच्या पिशवींत घालून दाबावे ह्मणजे कांहीं पारा छिद्रावाटे बाहेर पडतो आणि कांहीं पारा कणांशीं मिसळून रा-

हतो तो डमरुयंत्रानें काढावा, ह्मणजे केवळ सोनें मात्र अवशिष्ट राहतें.

सोनें, रुपें, तांबें इत्यादि धातु जेव्हां एकत्र मिश्र असतात तेव्हां त्या एकेक निरनिराळ्या काढण्याची रीति अशी आहे कीं, त्या धातूंच्या वजनाच्या तिप्पट नैत्रिक आसिद गलासांत घालून त्यांत तो मिश्रधातूंचा गोळा घालावा आणि सुमार दसपट पाणी त्यांत घालावें ह्मणजे नैत्रिक आसिद, त्या गोळ्यापैकीं सोन्यास विकार न करितां इतर धातूंचा रस करितें तो रस त्या आसिदांत मिसळतो, नंतर कांहीं वेळानें सोन्याचे कण तळीं बसतात. मग दुसऱ्या गलासांत तळचा सांखा तळींच राखून युक्तीनें वरचें आसिदानें मिश्रित पाणी ओतून घ्यावें, आणि खालचा सांखा मुशींत घालून आटवावा ह्मणजे तें शुद्ध सोनें होतें. दुसऱ्या गलासांत ओतलेल्या पाण्यांत सुमारें पावशेर पाण्यास दोन पैसेभार या मानानें मीठ टाकावें ह्मणजे कांहीं वेळानें रुप्याचे कण तळाशीं बसतात ते मुशींत घालून आटवावे ह्मणजे रुपें जमतें. मुलामा केलेल्या दागिन्याचें अथवा कलाबतूचें सोनें, रुपें अथवा इतर धातूंशीं मिसळलेलें सोनें किंवा रुपें असल्यास तें पृथक् काढणें झाल्यास वर सांगितल्या रीतीनें काढावें.

शुद्ध सोनें फार मऊ असतें ह्मणून त्याचा व्यवहारोपयोगी कोणताही दागिना किंवा नाणें करणें झाल्यास त्या सोन्यांत थोडथोडें रुपें किंवा तांबें मिसळतात ह्मणजे त्या मिसळीच्या योगानें दागिन्यास

किंवा नाण्यास कडकपणा येतो. मिसळ न घातली तर दागिना ओघळतो ह्मणजे लांबतो.

सोन्यांत जसजशी अधिक मिसळ घालावी तस तसें तें हिणकस होत जातें. ह्याच कारणामुळें एकाच सोन्याचे डाकलग दागिने बहुत वेळ केले ह्मणजे त्या दागिन्यांचें सोनें फार हलक्या दराचें उतरतें.

---

## निरस सोनें उंची करण्याचा प्रकार.

डाकलग मिसळीचें निरस सोनें उत्तम करणें झाल्यास तें पहिल्यानें आटवून लगड करून त्या लगडीचे पातळ पत्रे करून त्यांस आंच द्यावी.

### आंच देण्याचे प्रकार.

#### पहिला प्रकार.

वस्त्रगाळ राख करावी आणि तींत मीठ घालून ती वाटावी नंतर त्यांत पाणी घालून त्याचा गोळा करावा. मग वर सांगितलेले पत्रे घेऊन ते तेलांत बुडवून काढावे आणि त्यांतून एक पत्रा घेऊन त्याला वर सांगितल्या मसाल्यांतून थोडा मसाला घेऊन तो खालवर लावावा. नंतर दुसरा पत्रा घ्यावा आणि त्यासही असाच मसाल्याचा लेप द्यावा आणि तो पहिल्या पत्र्यावर ठेवावा. याप्रमाणें सर्व पत्रे एकावर एक ठेवून, राहिलेला मसाला त्या पत्र्यांसभोंवता लावून एक गोळा करावा. आणि त्यांवर एकेरी मेतकापड[१] लावावें. सुमारें पांच तोळे सोन्याचे पत्रे

---

१. माती लावलेलें फडकें.

असल्यास पावशेर मसाला असावा. नंतर गाढवा-च्या लिदीच्या वाळलेल्या पातळ गोवऱ्या कांहीं शेग-डींत घालून त्यांवर तो गोळा ठेवावा आणि त्यासभों-वत्या कांहीं गोवऱ्या लावाव्या व कांहीं वर घाला-व्या आणि त्यांस अग्नि लावावा. गोवऱ्या गाढवाच्या लिदीच्या अथवा रानशेण्या किंवा वळशेण्याही चाल-तात. गाढवाच्या लिदीच्या आंगीं क्षार असतो ह्मणून त्या लिदीच्या गोवऱ्या घातल्या असतां पत्र्यांती-ल मळ लवकर जळून जातो आणि सोनें चांगलें होतें. रानशेणींच्या आंगीं कस अधिक असतो त्यामुळें आंच कमी पुरत्ये आणि वळशेणीच्या आंगीं कस कमी ह्मणून त्या घातल्या असतां आंची अधिक द्याव्या लागतात. शेगडींतील अग्नि विझून राख अगदीं थंड झाली ह्मणजे त्यांतील तो गोळा काढून फोडून त्यांतील पत्रे कितपत झाले हें पाहावें. पत्र्यांत वा-ईट अंश राहिला असल्यास पुनः पूर्ववत् भट्टी लावावी तीही भट्टी वर सांगितल्या प्रमाणें थंड झाली ह्मणजे पत्रे काढून पाहावे आणि त्यांचा रंग चांगला उतरला नसल्यास ते मुशींत घालून आटवावे आणि त्या सोन्याचे पत्रे करून पूर्वींप्रमाणेंच पुनः आंच द्यावी. दोन तीन आंची दिल्यावर पुनः पत्रे आटवावे. याचें कारण, क्षाराच्या योगानें पत्र्याच्या खालचा वरचा वाईट अंश जळून जातो आणि मधला वाईट अंश वसाच राहतो तो पुनः पत्रे आटवून त्या सोन्याचे पत्रे केले असतां सर्वगत होतो. नंतर त्यांस आंच दिली ह्मणजे वाईट अंश बहुतकरून अगदीं जळून

जातो आणि सोनें चांगलें होतें. भट्टीची शेगडी विस्तव लावून निवाऱ्यास ठेवावी ह्मणजे आंच चांगली बसत्ये. सोनें मध्यम असल्यास दोन तीन आंची पुरतात. सोनें हिणकस असल्यास त्याच्या हीनत्वानुरूप आंची अधिक द्याव्या लागतात ह्मणजे सोनें चांगलें होतें. वर सांगितलेला मसाला आंचींत जळतो; परंतु त्याची राख पुनः पाण्यांत कालवून पूर्वींप्रमाणेंच पट्ट्यांस लाविली असतां दोन वेळ आंच देण्याच्या उपयोगीं पडते.

## दुसरा प्रकार.

बांगडखार वाटून त्यांत रानशेणीची राख घालून थोडें पाणी घालून बारीक खलून गोळा करावा. नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें पत्रे तेलांत बुचकळून त्यांस तो सदर्हूप्रमाणें मसाला लावून मतकापड करून आंच द्यावी. या रीतीनें केलें असतां सोनें रंगास लाल उतरतें.

## तिसरा प्रकार.

पक्की भाजलेली तांबडी वीट घेऊन तिची बारीक पूड करावी आणि तींत मीठ घालून खूब वाटावी. नंतर त्यांत पाणी घालून त्याचा गोळा करावा. नंतर सर्व क्रिया पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावी.

अथवा विटकर आणि सोरा एकत्र वाटून त्या मसाल्याची आंच देतात. डाकलग आणि फार निरस सोनें असल्यास हा प्रकार योजावा.

पत्र्यांसभोंवती लावलेल्या मसाल्यास वसुद ह्मणतात,

ती वसुद पुष्कळ जमवून झारेकरी त्यांतूनही सोनें व रुपें काढितात. ज्या दुकानीं नेहमी सोन्याचें व रुप्याचें आटणें व पिटणें चालतें त्या दुकानचा केर व बागेसरींतील राख व दुकानांतील धुराचीं कोळिष्टकें वगैरे झारेकरी विकत घेतात आणि त्या केर वगैरे जिनसांतून सोनें व रुपें काढितात.

## सुवर्णपरीक्षा.

निघर्षण, छेदन, ताप आणि ताडन अशी चार प्रकारची सुवर्णपरीक्षा शास्त्रांत सांगितली आहे व हल्लीं व्यवहारांतही कसास लावणें, तोडणें किंवा सुलाख घालणें, तावणें आणि ठोकणें ह्या चारही परीक्षा सुरू आहेत त्या येणें प्रमाणें:—

[१]गंडकी नदींतील पक्की व चांगली गुळगुळीत शिळा घ्यावी अथवा तसल्या प्रकारचा ( ज्यावर सोनें घांसलें असतां धोंडा न घासतां सोनें मात्र घासलें जावें असा) कोणताही धोंडा घ्यावा. यास कसोटी ह्मणतात. त्या कसोटीवर सरस निरस अशीं तीन चार प्रकारचीं सोनीं जवळ जवळ घासावीं आणि ज्या सोन्याची परीक्षा करणें असेल तेंही त्या कसोटीवर त्या कसांच्या शेजारीं घासावें आणि पहावें. मग ज्या सोन्याच्या कसाबरोबर त्या सोन्याचा कस लागेल त्या सोन्याच्या दराप्रमाणें याचा दर आहे असें समजावें.

---

१ गंडकींतील शिळा प्रायः निबर, गुळगुळीत, काळी आणि जिल्हईदार असते; त्या शिळेवर सोन्याचा कस चांगला उमटतो व सोनें फार झिजत नाहीं ह्मणून कसोटीकरितां तीच शिळा घेतात.

## सुलाख घालण्याचा प्रकार.

सोन्यास खोलगट भोंक पाडून तें भोंक कांहीं एक हत्यारानें भुरळावें ( ह्मणजे थोडासा वरचा अंश खरडावा ). भोंक पाडणें तें जिन्नस जसा पातळ किंवा जाड असेल त्याप्रमाणें उथळ किंवा खोल पाडावें आणि तें भुरळावें; कारण भुरळलें नाहीं तर जिनसाच्या पोटांतल्या अंशाचें रूप स्पष्ट समजुतींत येत नाहीं. मग तें सोनें चागलें लाल तापवून तसेंच निववावें. पाण्यांत बुचकळूं नये. नंतर वरच्या रंगाप्रमाणें आंतला ह्मणजे सुलाखाच्या पोटांतला रंग असला ह्मणजे आंत बाहेर सोनें सारखें आहे असें समजावें. कदाचित कांहींएक पदार्थांच्या स्पर्शानें वरचा रंग कमी दिसतो असेंही घडतें; तथापि तो सुलाखांतला रंग खरा जाणावा. तसाच वर चांगला दिसून सुलाखांतील वाईट दिसला तर सुलाखांतील जो दिसेल तोच खरा जाणावा. सुलाख घालून सोनें तापवून अग्नींतून बाहेर काढल्यावर सुलाखाचें तोंड वर करून ठेवलें असतां मूळचा रंग जसा असेल तसाच दिसतो आणि सुलाखाचें तोंड खालीं करून ठेवलें असतां रंग खऱ्या रूपापेक्षां कांहीं चांगला दिसतो.

दागिन्यास हुंड देऊन रंग चांगला आणला असल्यास तो सुलाख घातला ह्मणजे कळतो. ( व मुलाम्याचा किंवा पुरणाचा दागिना असेल तर तोही समजुतींत येतो. ).

सोन्याचा पदार्थ फारच जाड असेल तर तो मध्यें

तोडावा ह्मणजे इतर धातूंचा तुकडा पोटीं घातला असल्यास तोही दृष्टोत्पत्तींत येतो.

सोनें आटून लगड करून बळकट ठोकावें ह्मणजे कृत्रिमी सोनें ( किमयासारख्या कृतीचें अथवा पितळेच्या भेळाचें ) असल्यास चांगलें आटत नाहीं. आटलें तरी ठोका सोशीत नाहीं, ठोके मारले असतां फुटतें.

सोन्याचा रस करणें असल्यास सोनें मुशींत घालून तावावें आणि त्यांत सवागी घालावी ह्मणजे रस होतो. सोन्याचा रस नुसत्या तावानें होतो; परंतु चांगला व लवकर होत नाहीं ह्मणून रस होण्याचे सुमारास थोडी सवागी घालावी.

कथील, पितळ, किंवा शिसें यांचा यत्किंचित् अंश सोन्यांत मिसळला असतां त्या सोन्याचा रस केला तर तो सारखा जमत नाहीं. या करितां तसल्या सोन्याचा रस होत आला ह्मणजे त्यांत थोडा रसकापूर घालावा. तेणेंकरून वाईट अंश जळून रस चांगला जमतो.

अथवा सोन्यामध्यें अन्य धातूंच्या संबंधामुळें फुटण्याचा गुण थोडा उत्पन्न झाला तर त्या सोन्याचा रस करीत असतां त्यांत गंधक घालावा. सोन्याचा रस चांगला न जमला तर सोनार मुशींतील रस सनकाड्यांनीं ढवळतात. तिच्या तोंडास गंधक असतो त्याच्या योगानें रस चांगला जमतो व फारच थोडा दोष उत्पन्न झाला तर मोरचूद घालावा ह्मणजे रस चांगला जमतो व फुटतही नाहीं; परंतु रस चांगला

झाला किंवा नाहीं हें रस पाहून जाणावें आणि त्या रसाचे रूपदर्शनानें त्यांत वाईट अंश किती आहे हें ओळखून त्याचे योग्यतेप्रमाणें वर लिहिलेले तीन पदार्थांतील जो पदार्थ घालणें तो घालावा. परंतु रस पाहून ओळखणें हें फार सूक्ष्म आहे. ह्मणून समजण्यांत न आलें तर त्या रसाची लगड ठोकली ह्मणजे फुटल्ये ती कितपत फुटल्ये ती पाहिली ह्मणजे स्पष्ट ज्ञान होतें. याप्रमाणें वर लिहिलेले पदार्थ रसांत घालावे.

सोनार दागिना घडतेवेळेस सोनें तापवून पाण्यांत विझिवतात, तें पाणी मातीच्या अगर दगडाच्या भांड्यांत ठेवावें. पितळेच्या किंवा कथिलाच्या अथवा कल्हईच्या भांड्यांत पाणी ठेवून त्यांत सोनें विझवूं नये; कारण त्यांच्या वासानें फुटण्याचा दोष उत्पन्न होतो.

---

## दागीने करण्याची सामग्री व रीति.

सोन्याचे दागिने देशभेदानें व ज्ञातिभेदानें बहुत आहेत त्यांचीं नांवें समजण्यापासून विशेष फायदा नाहीं; परंतु दागिने करण्याची सामग्री व कांहीं अवयव करण्याची रीति कळली असतां बहुत फायदे आहेत ह्मणून लिहितों.

### सोनाराचीं हत्यारें.

| | |
|---|---|
| ऐरण. | पडघण. |
| हातोडे लहान व मोठे, तऱ्हतऱ्हेचे. | कातरी. |
| | पताळी. |

सांडस.
सवाणा.
गाळ्या तऱ्हतऱ्हेच्या, लांब तोंडाच्या अवरवजा इत्यादि.
मनखुरा.
खुरा.
कांकणता.
चौघड्यादिक आवट्यांवर खोलण्याचीं हत्यारें खिळेवजा त्यांचें सामान्य नांव.
खोलणें.
संप.
पोगर.
कैवर.
तऱ्हतऱ्हेच्या आवट्या.
वेझपट्टी.
फुंकणी.
भाता.
कानस.
ठसे टांकवेटण्याचे.
सामता.
गढी.
मठारणी.
ओपसळई.
चात.
लहान शेग्रा.
निसळणी.
घोटणी किंवा पऱ्हाळी.

येणेंप्रमाणें सोनाराचीं हत्यारें लिहिलीं त्यांत चौघडा, आवट्या, ठसे अशीं नांवें व्यवहारांत प्रसिद्ध आहेत; परंतु ते सर्व ठसेच होत. ते अनेक प्रकारचे आहेत. त्यांची गरज लागली असतां अमुक वेटण्याचा ठसा किंवा आवटी, गढी इत्यादिक दे असा बोलण्याचा व्यवहार आहे ह्मणून अमुक प्रकारचें अमुक ह्मणजे कंगण्या वेटण्याची, पेरे करण्याची आवटी असे प्रकार लिहिल्यानें ग्रंथविस्तार फार होतो ह्मणून सामान्य नांवें लिहिलीं.

बागेसरी.

उकाढा करण्याचें मडकें.

उजळा वगैरे वाटण्यास सपाट धोंडा.

ताजवा, वजनें.

पाणी ठेवण्याचा कुंडा.

काव वगैरे ठेवण्यास नरटी, किंवा शिंप घेत असतात.

हत्यारांस धार लावण्यास सहाण.

सोनें, रुपें वगैरे धातूंचे दागिने करणारांस सोनार ह्मणतात; परंतु सर्व प्रकारचे दागिने किंवा कांहीं एक दागिन्यांचे सर्व प्रकार एकाच्याच हातून होत नाहींत. कांहीं कांहीं प्रकार दुसऱ्यांचे हातून घडले जातात व ते आपण स्वतंत्र कसबी असें मानितात. त्यांचीं नांवेंही त्यांचे कसबाप्रमाणें निरनिराळीं आहेत ह्मणजे, पावटेकरी, नकासगार आणि जड्या. परंतु हे सर्व एक कार्य करणारे (ह्मणजे दागिने करणारे) होत, ह्मणून पावटेकरी वगैरेंचाही प्रकार येथें अंशतः लिहितों.

## पावटेकरी.

पावटेकरी रुप्याचे लगडेवर सोनें चढवितात; जाड तारेचे दागिने (ह्मणजे सांखळ्या, वेळा वगैरे) हे करितात. हे रुप्याची जाड तार सुलभ रीतीनें लौकर व हवी तितकी लांब काढतात.

### पावटेकरी यांचीं हत्यारें.

मोठ्या मोठ्या वेझपट्ट्या.

मोठा जाड अंबर.

गावी, एक टोंक चतुष्कोण पन्हळीसारखें व दुसरें टोंक चापट अशा तोंडाची असते तेणेंकरून तापलेली लगड घण मारते वेळेस धरावयाची सोय बसते.

घण, ह्मणजे फारच मोठा हातोडा.

अंबर, मोठी तार धरतां येई असा गोल तोंडाचा फार जाड.

पावटा, मोठी तार हातानें ओढली जात नाहीं कारण तीस मोठा जोर पाहिजे याकरतां ती सुलभ उपायानें ओढतां यावी ह्मणून राहटानें ओढतात त्या राहटास पावटा ह्मणतात.

याशिवाय कांहीं हत्यारें असतात तीं सोनाराच्या हत्यारांप्रमाणें असतात.

## नकासगार.

नकासगार हे दागिन्यास फूल, पत्ता, राघू, नाग इत्यादि नकशी वठिवतात.

राळेंत विटकरेची पूड व तेल घालून ऊन करून तिचा रांधा करितात. ती राळ दागिना नकसाया जोग्या एका धोंड्यावर घालून तिजवर सोन्याचें तकट बसवून तें यथायोग्य हत्यारांनीं ठोकून ठोकून पाहिजे त्या आकारास आणितात. भरींव दागिना असल्यास त्या दागिन्याचे कांहीं कांहीं प्रदेश पताळीनें थोडथोडे तोडून दडण्यादिकानें दडपून कोरून करतात. परंतु संपूर्ण क्रिया प्रत्यक्ष पाहून हातानें केल्यावांचून त्यांतील मर्में समजणार नाहींत ह्मणून

त्यांच्या क्रियेचा विस्तार लिहून उपयोग नाहीं, यासाठीं विस्तार लिहिला नाहीं.

नकासगारांचीं हत्यारें सोनारांच्या हत्यारांपैकीं थोडींशीं असतात; परंतु त्यांशिवाय असतात तीं लिहितों:—

| | |
|---|---|
| दडणें. | संप. |
| साधा नखोडा. | पोगर. |
| पताळी. | डेली. |
| कांटा. | मोधारणें. |
| रवाळणें. | तिधारें. |
| गुजरणी. | फुलदडणें. |
| बाजू दडणें. | घाट्या ह्मणजे फार लहान हातोडी. |
| पताळी नखोडा. | |
| लुडतें. | |

## जड्याचीं हत्यारें व कांहीं क्रिया.

| | |
|---|---|
| सळई वाजिरमूठ. | घोट्या दोन प्रकारचा. |
| सुलाखणी. | रुखा. |
| दडणें. | जिल्हईचा. |
| घसरपट्टी. | हुंडी चिरफळीची साधी. |
| पनसाळ. | साहणा चार प्रकारच्या. |
| जिल्हईची आवटी. | पूड घोटण्याचीवडसाहण. |
| चापट तोंडाच्या सळया. | खर साहण. |
| कांशाची निसळण. | मिठीसाहण. |
| | छिलायची साहण. |

कोंदणाची जडणी करितो त्यास जड्या ह्मणतात. रत्नखचित दागिन्यास जड्या कोंदण अशा प्रकारानें चढवितो कीं, दागिन्याचे घरांत लाख घालून खड्या-खालचें अंगास तयार केलेलें पूड लावून खडा बसवितो. नंतर सुलाखणी, ऊन करून खड्याभोंवतालें कोंदणाचे तुकडे लाखेंत खोंचून खोंचून बसवितो. मग सळईत वजीरमूठ अडकवून वजीरमुठीवर हात टेंकून सळई धरून त्या सळईनें कोंदण खचून खचून बसवितो. नंतर तें कोंदण चापट तोंडाच्या सळईनें व दडण्यानें छिलतो व दाबतो. अशा रीतीनें दाबून दाबून व छिलून छिलून सुशोभित तऱ्हतऱ्हेचे आकार करतो.

पच्ची ह्मणजे वर लिहिल्याप्रमाणें खडा बसवून खड्याभोंवतालची, साधनी घसरपट्टीनें, खड्याभोंवताली साधनी रेटून साधनीचा वरचा थोडा प्रदेश खड्यावर येई अशी बसवितो आणि खड्यावरचा प्रदेश वर लिहिलेल्या क्रियेनें सुशोभित करितो.

बहुतेक दागिन्यांस सूत, पत्रा, पट्टी, पेरा, करमरे, पैलू, रवे, कोयंडे, मळसूत्र, बिजागर, टिका, आणि मणी वगैरे अवयवांतील कोणास कांहीं कोणास कांहीं असतात, ह्मणून हें करण्याचें ज्ञान असेल तर त्याला बहुतकरून कोणत्याही प्रकारचा दागिना स्वचातुर्यानुरूप व हस्तकौशल्यानुसार करतां येईल. परंतु कांहींच मार्ग माहीत नसला तर दागिना करूं लागलें असतां फारच जड पडेल. कदाचित करतांही येणार नाहीं. ह्मणून यादेशांत अवयव करण्याचा मार्ग जो

सुरू आहे त्यांतील कांहीं अवयव व त्यांची कांहीं क्रिया लिहितों.

## सूत.

सोन्याचा तुकडा लांब व गोल करून त्याचें एक तोंड बारीक करितात त्यास आरोसा ह्मणतात. तें वेझपट्टीच्या वेझांत बळकट खोंचावें आणि वेझांतून सुमारें एक बोट बाहेर निघालें ह्मणजे ती वेझपट्टी दोन्ही पायांच्या अटीनें दाबून, गावीनें वेझपट्टीच्या बाहेर आलेलें टोंक धरून ओढावें. एका वेझांतून सगळें सूत निघालें ह्मणजे त्याहून जें लहान वेझ असेल त्यांतून सदरीं लिहिल्याप्रमाणेंच ओढावें; याप्रमाणें आपणास हवें तितकें तें बारीक करावें. सूत गावीनें धरून ओढतेवेळेस गावी निसटते ह्मणून गावीच्या तोंडीं बारीक गार देऊन ती बळकट चुरावी ह्मणजे गावीचें तोंड खरमरीत होतें त्या योगानें सूत ओढतेवेळेस गावी निसटत नाहीं.

## पत्रा.

सोन्याचा तुकडा ऐरणीवर ठेवून हातोड्यानें ठोकून चतुष्कोण, किंवा वर्तुळ, व जाड अथवा पातळ जसा हवा तसा करावा. पट्टी अरुंद व लांब अशी हवी असल्यास पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तार ओढून ती ठोकून पट्टी करावी आणि त्या पट्टीचे हवे तसे तुकडे करावे.

## पेरे.

अर्धमण्याकृति खांचांच्या लहान मोठ्या, सुरेख व सारख्या एकापेक्षां एक उताराच्या ओळी असतात, अशी आवटी ऐरणीवर ठेवून तिजवर यथायोग्य तार ठेवून ती हातोड्यानें ठोकितात ह्मणजे ती एकाबाजूनें चापट होऊन तिच्या दुसरे बाजूस अर्धमण्याकृति वठवितात त्यांस पेरे असें ह्मणतात.

## करमरे.

हरपरेवडीचा जो एक अंश ह्मणजे पांकळी तिच्यासारखीच (परंतु हरपरेवडीची गोल असते व हीस कोंच असते) पांकळी एकीलगत एक अशी ओळीची ओळ वठेल असा एक कांशाचा ठसा असतो त्याजवर पन्हळीसारखा वांकविलेला सोन्याचा पत्रा ठेवून खोलन्यासारख्या हत्यारांनीं ठोकून ठोकून वठवितात त्यांस करमरे ह्मणतात.

## पैलू.

मण्यावर किंवा सल्ला वगैरे दागिन्यांवर शोभावयाजोगे त्रिकोण, अगर चतुष्कोण आकार करतात त्यांस पैलू ह्मणतात. ते पैलू ठोकून अथवा छिलून करितात. त्यांपैकीं छिलून केलेले चमकदार होतात.

## रवे.

### पहिला प्रकार.

रवे ह्मणजे वाटोळ्या गोळ्या असतात त्या करण्याचा प्रकार.

सोन्याची तार वांकवून त्या वांकविलेल्या टोंकास सवागी उगाळून लावावी आणि दिव्याच्या दोन वाती थोड्या वेगळ्या करून दोन्ही ज्योति सलग्न असतां दोहींमध्यें तें सवागी लावलेलें टोंक धरावें, ह्मणजे टोंकाच्या तोंडाशीं रस होऊन गोळी बनते तीस रवा ह्मणतात. तसले रवे दागिन्यास मोत्यें लावितात त्याचे उपयोगीं पडतात.

## दुसरा प्रकार.

एका चापट कोळशास बारीक बारीक बहुत छिद्रें पाडून त्यांत समान वजनाचे सोन्याचे तुकडे घालून जसें सोनें आटितात तसें हे आटून गोळ्या करतात. हे रवे ठुशा वगैरे दागिन्यांस जोडितात.

## कोयंडे.

सरळ व खोल एकगोली अथवा दुगोली एकापेक्षां एक उताराच्या ज्यांवर रेघा असतात, असल्या आवट्यांवर तार किंवा सूत धरून ठोकलें असतां तें सूत एका अंगानें गोल व दुसऱ्या अंगानें चापट असें होतें. दुगोली करणें असल्यास थोडें चापट सूत करून वठवावें ह्मणजे दुगोली होतें. त्या तारेचीं गोल अंगें वर करून एका सळईवर धरून वांकवून गोल कडी करतात त्यांस कोयंडे ह्मणतात. ते कोयंडे ताईत, ठुशा वगैरे दागिन्यांस लावितात.

## मळसूत्र.

एक दांडा गोल करून त्याच्या सभोंवती बारीक तार समांतरानें गुंडाळावी; मध्यें जागा ठेवावी तिचें प्रमाण असें कीं, जी गुंडाळलेली तार आहे तेवढी दुसरी तार मध्यें सहज राहील एवढी जागा ठेवावी, आणि मधला दांडा व गुंडाळलेली तार डाकानें जोडावी. त्या डाकाचा कांहीं अंश तारेच्या अंतरामध्यें किंवा वर अधिक लागला असल्यास घासून काढावा, ह्मणजे फिरण्यास अडचण पडणार नाहीं. तें मळसूत्र ज्या नळींत बसवायाचें तिच्या तोंडीं आंतल्या बाजूस तारेचा दीड वेढा, वर सांगितलेलें मळसूत्र आंत फिरून बळकट बसे असा करून डाकानें पक्का बसवावा. मळसूत्र ह्मणजे "स्क्रू" तो ज्या रीतीनें करतात त्या रीतीनें मळसूत्र केलें असतां सुलभ व सुरेख होईल. सोनार बहुतेक करीत नाहींत.

## बिजागर.

एक नळी करून तिचे तीन विभाग समान करावे आणि तीनही विभागांमध्यें माफक फिरे अशी एक तार घालावी व ती तार त्यांतून न निघावी ह्मणून तारेचीं दोन्ही टोकें फुलवावीं. त्यांतील मधला मात्र विभाग फिरावा यासाठीं मधला विभाग एके अवयवास व बाजूचे दोन भाग दुसरे अवयवास जोडतात. अशा पदार्थास बिजागर ह्मणतात.

## टिका.

वाटोळ्या किंवा चौकोनी अथवा चौफुलीच्या अशा लहान लहान सुशोभित साध्या नकशीच्या टिकल्या करतात त्यांस टिका ह्मणतात.

### वाटोळ्या टिका करण्याचा प्रकार.

तारेचे समान तुकडे पाडून ते तुकडे उभे ठेवून ठोकतात ह्मणजे वाटोळ्या टिका होतात. चौकोनी कर्तव्य असल्यास, प्रथम पट्टी करून तिचे चतुष्कोण तुकडे करितात.

अथवा सोन्याच्या तुकड्यांवर रवे जोडून किंवा नकशीच्या ठशावर बेटून अशा तऱ्हेतऱ्हेच्या ज्याज्या दागिन्यास जसजशा शोभतील तसतशा आपल्या बुद्धिकौशल्यानें करतात.

## मणी.

### पहिला प्रकार.

चौघड्यावर वर्तुळ, खोलगट, लहान, मोठीं, क्षेत्रें असतात त्यांजवर क्षेत्रापेक्षां जास्त वाटोळा पत्रा ठेवून खोलन्यानें ठोकून ठोकून तो क्षेत्राप्रमाणें करावा. असले दोन अर्धगोलाकृति करून एक गोल दिसेल असे जुळावे. जोडाचे संधींत कांहीं अंतर राहिलें तर त्यांच्या कडा घांसून बरोबर जुळावे नंतर तो संधि डाकानें पक्का झाळावा. यारीतीनें मणी केल्याव-र थोडें पाणी घालून घोळावे ह्मणजे थोडे लहान मोठे झाले असल्यास ते सारखे होतात.

## दुसरा प्रकार.

डाकानें तोंड झाळलेली आखूड नळी मनखुऱ्यावर अडकवून लहानशा चापटशा हत्यारानें घडून घडून आकृति गोल करावी त्यास मणी ह्मणतात. नकशी किंवा पैलू पाडणें असल्यास त्यांत राळ भरून नकसून ठोकून करावे.

असे दागिन्यांचे अवयव तऱ्हतऱ्हेचे बहुत आहेत. ते अवयव ठशावर तऱ्हतऱ्हेचे हत्यारांनीं खोलतात. किंवा ठशावर सोन्याचा तुकडा यथायोग्य ठेवून वर हतोड्यानें ठोकतात ह्मणजे खालच्या नकशींत पत्रा सर्व प्रदेशभर सारखा बसतो तेणें करून त्या पत्र्यावर ठसा चांगला वठतो. याप्रमाणें दागिना करण्याचे प्रकार वस्तुभेदानें भिन्न भिन्न आहेत ते तर्कानें योजावे. परंतु तर्क चालविण्यास क्रिया माहित पाहिजेत. या साठीं वर लिहिलेली अवयवांची क्रिया मनांत ठेवली ह्मणजे बहुतेक दागिने करण्यास मति चालेल.

## कोंदण.

हल्लीं लोकव्यवहारामध्यें उत्तम सोनें ह्मणजे जुन्या पुतळीचें खरें, परंतु कोंदणास त्यापेक्षांही अधिक चांगलें पाहिजे ह्मणून पुतळीच्या सोन्यासही दोन तीन आंची देऊन त्यांतील वाईट अंश जाळून झालेलें जें अत्युत्तम सोनें त्याची बारिक तार करावी (ह्मणजे तार चापट करावी) आणि निसळण्यानें ठोकून ठोकून साफ करावी आणि एकावर एक वेढे पडतील

अशी गुंडाळावी. वेडीवांकडी गुंडाळून वांकड्या मोडी पाडून चुरमडूं देऊं नये. गुंडाळलेला चपडा तसाच ठोकून ठोकून फार पातळ करावा आणि तावावा. या प्रकारें यासच कोंदण ह्मणतात. या कोंदणास वारंवार हात लागला असतां हाताच्या अल्पही मळानें जडते वेळेस जमत नाहीं व कोंदणाचा तुकडा जडण्यास फार लहान लागतो, तो हातानें सोईचा उचललाही जात नाहीं ह्मणून जडते वेळेस कोंदणाचा तुकडा सळईनें टोंचून घेतात.

---

## डाक.

डाक ह्मणजे धातूंचे कांहीं अवयव एकत्र चिकटविणारा जो पदार्थ तो.

सोन्याचा डाक करण्याचा व डाक लावून झाळण्याचा प्रकार.

---

### डाक करण्याचे प्रकार.

#### पहिला प्रकार.

ज्या सोन्याचा दागिना करणें असेल त्या सोन्याचा तुकडा डाकापुरता घेऊन त्याचा डाक करावा. कारण चांगल्या सोन्याच्या दागिन्यास वाईट सोन्याचा डाक केला तर त्यायोगें सोनें फार वाईट होईल. वाईट सोन्याचे दागिन्यास चांगल्या सोन्याचा डाक केला तर जोडलें जाणार नाहीं. डाकाचा रस होण्याच्या बरोबरच दागिन्याच्या अवयवांचा रस होऊं लागेल. परंतु दागिन्याच्या मासल्याचें सोनें नसल्यास डाकांत सुव-

णांचा जो भाग पूर्ण घालावयाचा त्यापेक्षां कमी घातला असतां जप्त जाईल.

एक भाग तांबें, चार भाग रुपें, एकत्र आटून मिसळलेला जो पदार्थ तो एक भाग घेऊन त्यांत साहा भागांपासून आठ भागपर्यंत सुवर्ण घालावें. पातळ दागिना असल्यास साहा भाग आणि जसजसा जाड दागिना असेल त्या त्या प्रमाणें आठ भागांपर्यंत सुवर्ण घालून एकत्र आटून रस होत आला ह्मणजे त्याच्या विसाव्या भागाइतकें जस्त घालून रस चांगला झाला ह्मणजे मुईवर ओतावा. असा जो जिन्नस होतो त्यास डाक ह्मणतात. तो डाक लवकर हातोड्यानें चेपावा ह्मणजे ठोकून पातळ करण्याची मेहनत कमी पडते. मग तो ठोकून ठोकून फारच पातळ करितात त्यास पत्ती ह्मणतात.

### दुसरा प्रकार.

रुप्यातांब्याचा मेळ न करतां नुसतेंच तांबें घालून व थोडेंसें जस्त घालून वर लिहिल्याप्रमाणें डाक करावा. ह्यानें पातळ दागिना जोडण्यास जड जातो, कारण त्या डाकाचे आंगीं कोवळेपणा असतो ( ह्मणजे लौकर वितुळत नाहीं. )

### तिसरा प्रकार.

सोन्यांत सुमारें तृतीयांश मोरचूद मात्र घालून व थोडें जस्त घालून डाक करावा. हा डाक उंची सोन्याचा दागिना जोडण्यास उपयोगीं पडतो.

### चवथा प्रकार.

सोन्यांत अदमासें अष्टमांश जस्त व थोडा सोमल

घालून डाक करावा. हा डाक लवकर वितुळतो. या डाकानें पातळ दागिनाही जोडला जातो. परंतु हा निरस डाकाप्रमाणें पांढरा दिसतो.

पांचवा प्रकार.

उंची सोन्याच्या दागिन्यास सोन्यांत चतुर्थांश जस्त मात्र घालून डाक करावा, आणि निरस सोनें असल्यास दोन भाग सोनें व एक भाग जस्त आणि अर्धा भाग रुपें एकत्र आटून डाक करावा.

साहवा प्रकार.

दोन भाग तांबें, एकभाग जस्त व एकभाग सोनें एकत्र करून त्याचा डाक करावा. वरकड सर्व क्रिया प्रथम प्रकारांत लिहिली आहे त्या रीतीनें करावी. ह्या डाकानें दागिना विशेष कमी योग्यतेचा दिसत नाहीं, परंतु दागिना मोडला असतां सोनें फार कमी दराचें उतरतें; कारण या डाकांत अन्यधातूंचें मिश्रण फार पडतें.

---

## झाळून काढण्याचे प्रकार.

पहिला प्रकार.

डाकाचे बारीक तुकडे करावे आणि सवागी पाण्यांत बारीक खलून त्यांत ते तुकडे कालवावे.

गार, कांच, बरणीचा तुकडा अथवा यासारखा कडक पदार्थ घेऊन तो कुटून चांगला बारीक करावा आणि त्यांत अजमासें थोडें मीठ व चिकटण्यापुरती किंचित् उडदांची डाळ, हे तीन पदार्थ पाणी घालून एकत्र खलावे त्यास लेवा अथवा पंज ह्मणतात.

दागिन्याचे जे अवयव एकत्र जोडावयाचे असतील त्यांच्या जोडाच्या जागीं, सवागी पाण्यांत खलून लावावी आणि ते जोडावे; जोड मनाजोगा बसला ह्मणजे तो न ढळावा ह्मणून त्याचे आजूबाजूस थोडा पंज लावावा आणि जवळ निखारा ठेवून तो शेकावा ह्मणजे दागिन्याचे अवयव एकमेकास चिकटून राहतात. नंतर सवागींत कालवलेला डाक त्या जोडाभोंवता बसवावा. आणि जवळ थोडा विस्तव ठेवून तो वाळवावा. नंतर तो पदार्थ अग्नींत ठेवावा आणि डाकावर नजर ठेवावी. तो बेताचा वितुळल्यावर विस्तवावर थोडें पाणी लवकर घालावें ह्मणजे आंच कमी होत्ये त्यामुळें डाक अधिक पसरत नाहीं. मग तो पदार्थ पाण्यांत बुचकळून पहावा आणि जेथें डाक चांगला बसला नसेल तेथें वर लिहिलेल्या क्रियेनें पुनः झाळावा.

### दुसरा प्रकार.

फार जाड दागिना असल्यास जोडाच्या जागीं पूर्वी सवागीचें पाणी लावून वर मोरचूद उगाळून लावावा आणि जोड बसवून दागिना उमलून ( ह्मणजे झाळून ) काढावा ह्मणजे जोड पक्का बसतो. परंतु यास आंच बहुत लागते ह्मणून पातळ दागिना असेल तर तो नुसते मोरचुदानें जोडला जात नाहीं.

बहुत करून वहिवाटींत डाक करण्याचा व झाळून काढण्याचा प्रकार लिहिला हाच सुरू आहे. परंतु डाक करण्यामध्यें कांहीं वेगळे वेगळे प्रकार आहेत ते खालीं लिहितों.

## हुंड देण्याचा प्रकार.

बिनडाकी व जाड दागिना गोट, पाटल्या वगैरे असल्यास विटकर आणि मीठ एकत्र करून प्रथम प्रकारांत सांगितल्या प्रमाणें त्या दागिन्यास आंच द्यावी, तीस हुंड ह्मणतात. हुंड दिल्यानें दागिन्याच्या वरच्या सर्व प्रदेशांतील वाईट अंश जळतो ह्मणून रंगास चांगला दिसतो; पण वजनास किंचित कमी भरतो. डाकलग किंवा पातळ नाजूक दागिन्यास हुंड देऊं नये; दिला असतां दागिना बिघडतो. ठळक दागिन्यासही हुंड थोडा देतात व तोही दागिन्याचें सोनें निरस असल्यास देतात. सोनें उत्तम असलें तर हुंड देण्याची गरज नाहीं. डाकलग दागिना असल्यास आमसोलांत उकडून काढावा ह्मणजे खारांचे वगैरे डाग पडलेले सर्व जातात.

## उजळा देण्याचा प्रकार.

घडून दागिना तयार झाला ह्मणजे त्यास उजळा देतात. तो असा कीं, सोरा, त्याच्याच चतुर्थांश नवसागर, नवसागराचा दशांश किंवा द्वादशांश अथवा षोडशांश मोरचूद हे तीनही एकत्र करून त्यांत पाणी घालून बळकट खलावे. ह्मणजे जो पदार्थ तयार होतो त्यास उजळा ह्मणतात. तो गंधाप्रमाणें पातळ करावा आणि सुवर्णाच्या दागिन्यास सर्वांगीं लावून चांगले निखाऱ्यांवर तो दागिना ठेवून त्या उजळ्याचा थोडा धूर जाऊन उजळा जळून सोन्याची चांगली प्रभा दिसूं लागे पर्यंत तो दागिना उल-

था पालथा करून शेकावा. तो निर्धूम होऊन अमळसा तापला ह्मणजे उचलून पाण्यांत बुचकळावा.

सोनें वाईट असल्यास वर लिहिल्याप्रमाणें मोरचूद अधिक घालावा. सोन्याच्या योग्यतेनुसार उजळा दोन तीन वेळ द्यावा. ( ह्मणजे दागिन्यास उजळ्याचा लेप देऊन तो तापवून पाण्यांत बुडविणें ही क्रिया दोन तीन वेळा करावी. )

वर सांगितलेला उजळा खलून फार वेळ ठेवूं नये. ज्या वेळचा त्या वेळेस खलून लावावा. उंची सोनें असल्यास मोरचूद घातल्यावांचूनही उजळा देतात.

उजळा देऊन झाला ह्मणजे ओपसळईनें जिल्हई देऊन मग उजळ्यामध्यें काव घालून पूर्वी प्रमाणें उजळा द्यावा. नंतर कुंचलीनें कुंचलून दागिना स्वच्छ करावा.

---

## वर्ख.

चांगले सोन्याचा पातळ पत्रा करून त्याचे अदमासें गुंज वजनाचे लांबट तुकडे करावे. आणि कमवून तयार केलेल्या हरिणाच्या कातड्याचे, सुमारें चार तसू रुंद आणि सहा तसू लांब असे दोन तुकडे करावे. याच लांबी रुंदी पेक्षां किंचित कमी असे बखीचे बहुत तुकडे करावे, ( बखी ह्मणजे हरिणाच्या आंतील फार पातळ कातडें ) आणि वर लिहिलेले दोन तुकडे व बखीचे अदमासें तीनशें तुकडे असे सहज मावतील अशी हरिणाच्या कातड्याची पिशवी करावी. मग

प्रथम सांगितलेले कातड्याचे तुकडे त्यांतील एका तुकड्यावर बखीचा तुकडा ठेवून त्याजवर वस्त्रगाळ सोनकावेची पोतंडी झटकावी. आणि वर लिहिलेल्या पत्र्यांचा तुकडा वर ठेवावा. त्यावर पुनः कावेची पोतंडी झटकून बखीचा तुकडा ठेवावा. असे एकावर एक थर ठेवावे. असे अदमासें चाळीस पन्नास थरांपेक्षां जास्ती तीनशें पर्यंत ठेवावे. थर फार कमी असल्यास मोठ्यानें ठोकलें असतां पत्रा फाटेल व हळूहळू ठोकलें असतां पत्रा वाढणार नाहीं आणि बहुतच जपून काम केलें तर फारच मेहनत लागेल, या कारणास्तव बहुत थर असावे. नंतर प्रथम लिहिलेल्या दोन तुकड्यांपैकीं राहिलेला कातड्याचा तुकडा वर ठेवावा. मग ते सर्व जुळलेले थर वर लिहिलेल्या पिशवींत घालावे. आणि पिशवीचें तोंड खळीनें चिकटवावें. नंतर ती पिशवी रुंद व सपाट ऐरणीवर किंवा चांगल्या गुळगुळीत दगडावर ठेवून हातोड्यानें खूब ठोकावी. नंतर पिशवींतून थर काढून त्यांतील पत्रे कितपत पातळ झाले हें पाहावें. नंतर पुनः पूर्ववत कावेची पोतंडी कातड्यावर झटकून पूर्वींप्रमाणेंच पत्रे ठेवून पिशवीचें तोंड बंद करून पत्र्याच्या पातळीच्या मानानें आणखी पिटावें. याप्रमाणें दोन तीन वेळ करून ठोकलें असतां वर्ख तयार होतात. मध्यें मध्यें कावेची पूड झटकल्यानें वर्ख चांगला लाल दिसतो. वर्ख तयार झाले ह्मणजे पिशवींतून ते बाहेर काढावे. नंतर सोन्याच्या वर्खांपेक्षां लांबीला व रुंदीला थोडे अधिक असे कागद घेऊन प्रत्येक कागदास खालींवर कावेची पोतंडी घा-

सून प्रत्येक कागदावर एक एक याप्रमाणें तो वर्ख उतरीत जावा. वर्ख हातानें उचलून कागदावर बसवूं नये; कारण तसें केलें असतां तो हातास चिकटून फाटून नासून जातो ह्मणून कागद पुठ्याचे खालीं धरून त्या कागदावर तो वर्ख सारखा बसेसा युक्तीनें पाडावा. मग ते सर्व कागद एकावर एक ठेवावे. मुलामा करणें असल्यास वर्ख थोडा जाड ठेवतात. सोन्याची शाई व हेमगर्भादि रसायण करण्यास वर्ख फार पातळ करितात.

## रुपें.

रुपें सोन्याप्रमाणेंच खाणींत, दरींत, अथवा रेतींतही सांपडतें. हें बहुतवेळ आटलें असतां थोडें जळतें. हें पाण्यापेक्षां सुमारें साडेदहापट वजनदार आहे. याच्या अंगीं आघातसहनशक्ति, पसरणें, तार ओढली जाणें, आणि चकचकी हे गुण सोन्यापेक्षां कमी व इतर धातूंपेक्षां जास्त आहेत. रुप्यास जंग चढतो, परंतु फार थोडा. असाच रुप्याच्या अंगीं कळंकही आहे. पण थोडा ह्मणून रुप्याचे भांड्यांत पदार्थ घालून ठेवला असतां तो किंचित कळकतो. दुधांत चांदी टाकली असतां तें विरजतें अशी ह्मण आहे.

अमेरिकेंत व युरोपखंडांत बहुत जागीं रुपें सांपडतें. एशिया खंडांत चीन वगैरे ठिकाणींही सांपडतें. रुपें काढण्याचा प्रकार बहुतेक सोन्याप्रमाणेंच आहे.

अशोधित रुप्याच्या गोळ्यांत बहुतकरून शिसें असतें, ते गोळे फोडून मुशींत घालून आटवावे. (रस चांगला न होईल तर सवागी आणि शिसें घालावें ) ह्मणजे आंचीच्या योगानें शिसें जळून जातें आणि निवळ रुपें सांपडतें.

रुपें अन्यधातूंच्या मिश्रणानें हिणकस झालें असतां तें शुद्ध करण्याचा प्रकारः—

कोळशाची राख व रानशेणीची राख दोन्ही गाळलेल्या समभाग एकत्र करून त्यांची मूस करावी. ती अशी कीं, त्या राखेस थोडा पाण्याचा हबका देऊन दडपून दडपून उंचट करून वरती दाबून दाबून वाटीसारखी खळगी करावी. नंतर मुशीचा भाग वर राखून सभोंवते विटांचे टोले मुशीला लावावे. मग त्या मुशींत रुपें घालावें आणि भोंवतालचे विटांवर मुशीस लावून मुशीवर तीन चार बोटें उंच येतील असे कोळसे लावून मूस झांकून पेटवावे. त्या कोळशांभोंवतीं कवलांचे तुकडे लावून ते झांकावे ह्मणजे थोडक्या कोळशांनीं आंच चांगली बसते. फुंकणीचें तोंड मुशिवर धरून बळकट फुंकावें. नंतर फार ताव आला ह्मणजे थोडी सवागी घालावी ह्मणजे रस होतो. चांगला रस फिरला ह्मणजे शिसें घालावें तें घातलें ह्मणजे वर त्याची साय धरते. शिसें सर्व जळे तोंपर्यंत ताव द्यावा. शिसें लवकर जळण्याकरितां मुशीच्या तोंडावर एक लांकडाचें टोक ठेवावें. तें पेटून जाळ झाला ह्मणजे त्याच्या योगानें शिसें लवकर जळतें याप्रमाणें करावें. रस स्वच्छ आणि स्थिर दि-

सला ह्मणजे रुपें शुद्ध झालें असें समजावें. तसें न झाल्यास पुनः त्या रसांत शिसें घालून तावावें. रस स्वच्छ आणि स्थिर झाला असें पाहून मुशीवर पाणी घालावें. आणि आंतील रुपें काढून बळकट ठोकावें तें फुटलें असतां त्यांत शिशाचा वास राहिला असें समजावें, आणि पुनः तें आटावें. कदाचित त्यांतूनही शिशाचा वास राहिल्यास पुनः आटते वेळेस रस होऊं लागला ह्मणजे सवागी घालितात. ती घातल्यावर थोड्या अवकाशानें थोडा नवसागर घालावा ह्मणजे शिशाचा वास राहत नाहीं. या प्रमाणेंच रूप्यास कथिलाचा वास असल्यास रुपें फुटतें ह्मणून वर लिहिल्या प्रमाणें नवसागर घालून आटलें असतां कथिलाचा वास जातो आणि रुपें स्वच्छ होतें. शिसें घालण्याचें मान अन्यधातूंचें मिश्रण चतुर्थांश असेल तर रुप्याच्या बरोबरीनें शिसें या मानानें अन्यधातूंचें मिश्रण जसें असेल त्याप्रमाणें शिसें कमजास्त अटकळीनें घालावें. चांदी काढून घेतल्यावर मुशींत कांहीं गाळ राहतो त्यास खरड असें ह्मणतात. तींत कांहीं अंश रुप्याचा असतो. ती खरड पुष्कळ जमवून तींतून रुपें काढतात.

---

## रुप्याची परीक्षा.

रुपें सोन्याप्रमाणेंच घासून पाहतात. परंतु तें ज्याजवर घासतात त्यास वर्कल ह्मणतात. तो वर्कल कुरुंदाच्या दांड्याचा केलेला असतो.

### पहिला प्रकार.

रुप्याची लगड ( सगळी छिनीनें तोडूं नये. पाहिजे तर किंचित हत्यारानें तोडावी, बाकीची हातोड्यानें ) आघातानें मोडावी. आणि मोडल्या ठिकाणीं ती पाहावी. लगड छिनी वगैरे हत्यारानें तोडली असतां त्या हत्याराच्या योगानें त्या जागीं धातूस चमक उत्पन्न होते तेणेंकरून वास्तविक रूप कळत नाहीं, ह्मणून लगड आघातानें मोडावी. ती मोड स्वच्छ आहे तशीच राहते किंवा कांहीं विवर्ण होते हें पाहण्यासाठीं तिला थोडें पाणी लावावें ह्मणजे रूप स्पष्ट ध्यानांत येतें. ह्मणून व्यापारी लोक मोडीस जीभ लावून पाहतात. मोड जशी उजळ दिसेल त्याप्रमाणें त्या रुप्याचा दर ठरवावा.

### दुसरा प्रकार.

सुवर्णास जसा सुलाख घालतात त्याप्रमाणें रुप्यास खोल कानसून तापवून जलस्पर्श न करितां तसेंच निववून पाहावें. ती कानसलेली जागा पांढरी दिसली तर रुपें चांगलें आहे असें जाणावें, आणि विवर्ण झाली असतां जितपत रंग उतरेल त्या मानानें तें चांगलें, वाईट ओळखावें.

### तिसरा प्रकार.

रुपें तापवून लाल असतांच मोठ्यानें ठोकून त्याचे आंगीं आघातसहनशक्ति किती आहे ती पाहावी. बहुत असल्यास चांगलें असें जाणावें. फुटूं लागल्यास जशी फूट येईल त्याप्रमाणें कमी योग्यतेचें जाणावें.

## रुप्याचा डाक करण्याचे प्रकार.

### पहिला प्रकार.

चार भाग रुपें आणि एक भाग जस्त एकत्र आटवून डाक करावा; आणि पुढली क्रिया ह्मणजे पातळ करणें, जोडणें इत्यादि सुवर्णाच्या डाकाप्रमाणेंच करावी. दागिन्याचें रुपें जसजसें निरस असेल त्याप्रमाणें जस्त अधिक अधिक घालावें.

### दुसरा प्रकार.

एकुणीस भाग चांदी, एक भाग तांबें, आणि दहा भाग पितळ एकत्र आटवून डाक करावा. वरकड क्रिया पूर्वीप्रमाणें जाणावी.

### तिसरा प्रकार.

दोन भाग चांदी आणि एक भाग पितळ एकत्र आटवून डाक करावा. वरकड क्रिया पूर्वी प्रमाणें करावी. हा डाक रुपें, तांबें आणि पितळ यांजवर चालतो.

## उकाडा.

रुप्याचा दागिना घडून तयार झाला ह्मणजे तो उकाड्यांत घालावा. त्याचा प्रकारः—चिंच आणि मीठ घेऊन एका मडक्यांत घालावें आणि त्यांत पाणी ओतावें. तें असें कीं, पाण्यांत दागिना बुडून दोन तीन बोटें पाणी वर राही इतकें. त्या चिंचवण्यास उकाडा ह्मणतात. शुद्ध चांदीचाच दागिना असल्यास उकाड्यांत मीठ घालूं नये आणि रुपें कमी योग्यतेचें असल्यास मीठ माफक घालावें. मीठ अधिक झाल्यास दागिना काळा पडतो. रुप्याचा दागिना त्या उका-

